ॐ श्रीगणेशाय नमः । भूशुण्डी देवांसी सांगत । द्वारयात्रा निरूपिली तुम्हांप्रत । तीच क्षेत्रप्रदक्षिणा यत्नयुक्त । देवदेवेशांनो करा आतां ।।१।। जेव्हां पुण्यकर्म करण्या इच्छित । त्यासाठीं प्रयत्न करित । तैं पापें फसवितीं विशेषयुक्त । मानवासी हें जाणावें ।।२।। नित्य यात्रा मयूरक्षेत्रवासीयांची । अन्यांचीही सांगतों साची । तीं एकचित्तें ऐकून मनाची । निश्चित तयारी तुम्ही करा ।।३।। मयूरेशास अर्चून । करावें परिवाराचें पूजन । तदनंतर अष्टगणपक्षेत्रपूजन । नदीकुंडासही पूजावें ।।४।। शमी मंदार दूर्वा पूजून । चतुर्थीचेंही आराधन । मुद्गल शुकयोगीशा वंदून । नंतर जावें मंडपांत ।।५।। पूर्वादिक्रमें चार वेद पूजावे । धर्मादिक यथावकाश नम्रत्वें वंदावें । पुन: गणेश्वरासी नमावें । तदनंतर जावें स्वगृहासी ।।६।। ऐसी जो नित्य यात्रा करित । तो गणेशप्रिय होय जगांत । ही नित्ययात्रा न करिता नराप्रत । क्षेत्रवासफळ पूर्ण न लाभे ।।७।। नित्य यात्रा न करित । भैरवी यातना त्यास अन्तीं लाभत । म्हणून नियमानें क्षेत्रस्थित । नरें यात्रा ही करावी ।।८।। आतां गणेश प्रीतिस्तव। अन्य यात्रा अभिनव । संपूर्ण भक्तिदा सर्वथैव । गाणेशी गणपप्रिय सांगतों ।।९।। गर्भागारीं चार दिशांत । विघ्नेश्वर असती स्थित । साठ विश्वेश्वर ते असत । त्यांतील मुख्यांसी पूजावें ।।१०।। दिक्पालांचीं महा अस्त्रें वर्तत । त्या विघ्नेश्वराच्या पुढें विलसत । पांच धनुष्यें अंतरावर गणपरत । सर्वही तीं भक्तिभावें ।।११।। चौदा प्रमाणांत स्थित । सभोवती दिशांत गणप वर्तत । त्यांचें पूजन करितां होत । गाणपत्य नर या

जगीं ।।१२।। बल्लाळ कपिल ढुंढि वक्रतुंड । महोदर हेरंब गणनाथ उदंड । गणनाथ विघ्नेश विघ्नहारक प्रचंड । भालचंद्र शूर्पकर्ण ।।१३।। ज्येष्ठराज गजानन । महोत्कट हे पूर्व दिशेंत प्रसन्न । राहती देवेशांनो त्यांचें पूजन । क्रमशः साधकें करावें ।।१४।। एकेकापासून पंचवीस धनुष्यें दूर । हे गणेशान संस्थित सुंदर । ऐसें जाणावें रहस्य मनोहर । भक्तगणांनी सर्वदा ।।१५।। पन्नास धनुष्यें अंतरावर । दक्षिणस्थ गणप बसले थोर । शंभर धनुष्यें असती दूर । पश्चिमेस गणप असंख्य ।।१६।। पंचाहत्तर धनुष्यें अंतरावर । उत्तरेस गणप असती थोर । ऐशा क्रमानें पूज्य ते समग्र । सिद्धिप्रदायक सर्वही ।।१७।। आतां दक्षिण दिशेस जे असती । त्या गणेश्वरांची सांगतों गणती । ज्ञानेश कर्मप महागणपति । योगेश सिद्धिविघ्नप ।।१८।। चिंतामणि बुद्धीश पूर्णानंद । लक्ष्येश सहजेश एकदंत मोदप्रद । लंबोदर धूर्मवर्ण क्षिप्र प्रसादकर । हे दक्षिणेस गर्भागारीं ।।१९।। आतां करितों वर्णन । पश्चिमेस जे गणेश्वर महान । विनायक विकट शोभन । आशापूरक धूम्रकेतू ।।२०।। प्रमोद मोद सुमुख दुर्मुख । पाशपाणि परेश लाभेश संमुख । धरणीधर मंगलेश सुरेख । मूषकध्वज तेथ असती ।।२१।। देवदेवेशांनो त्यांचें पूजन । करावें पाळून सर्व विधान । आतां उत्तरस्थ विघ्नपांचें वर्णन । भक्तचालकांचें सांगतों ।।२२।। मयूरध्वज राजेश विद्रुमेश्वर । ओंकारेश गुणेश वरद उदार । सिद्धिबुद्धिपति गणेश थोर । चतुर्बाहुधर त्रिनेत्र ।।२३।। गजमस्तक निधिप गजकर्ण । चिंतामणि गणेश्वर विभूषण । ऐसे हे पूजनीय महान । यात्रिकांसी देती इच्छित फल ।।२४।। आतां देवालयांत जे देव स्थित । त्यांची यात्रा तुम्हांस सांगत । मुख्य जी सर्वार्थप्रद पूर्ण वर्तत । यात्राकर्त्या जनांसी ।।२५।। अयोध्या मथुरा द्वारका असत । पूर्वमंदिरीं विलसत । महाविष्णू पूजनीय विशेषयुक्त । देवांनो

तेथ जाणा ।।२६।। काशी माया अवंती । तेथ कैलासवासी शिवाची वसती । गौरी स्कंदासहित भावभक्ती । दक्षिणेस मुख्यत्वें पूज्य ते ।।२७।। महाकाली महालक्ष्मी महासरस्वती । ह्या तीन आदिशक्ति । पश्चिम दिशेस पूजनीय असती । तैसीच विष्णुकांचिका ।।२८।। विधाता अग्नि जडभरत । दिवाकर शिवकांची उत्तरेस मंदिरांत । पूजनीय जनांस वर्तत । ऐसें रहस्य देवागाराचें ।।२९।। ह्या देवागाराची यात्रा करित । त्यास सर्व सिद्धि प्राप्त । हें यात्राविधान तुम्हांप्रत । संक्षेपें मीं निरूपिलें ।।३०।। यात्रा करितां जनांस होत । हें सर्व सिद्धिप्रद सतत । देवांनो जा तेथ त्वरित । मयूरेशाच्या क्षेत्रांत ।।३१।। तेथें भक्तियुक्त राहून । गणेशाचें करा पूजन । त्याचें करितां मनन ध्यान । इच्छित सर्व लाभाल ।।३२।। आदिशक्ति म्हणे अन्य देवींप्रत । ऐसें बोलून भ्रूशुण्डी थांबत । त्याच्यापासून मुख्यदेव घेत । दीक्षा एकाक्षर मंत्राची ।।३३।। विधियुक्त महामंत्र घेऊन । त्या योगीशास प्रणाम करून । प्रदक्षिणा देवासी घालून । ते पांचही देव परतले ।।३४।। ते सर्वही हर्षयुक्त । मयूरेशक्षेत्रीं जात । पुढील कथा रसयुक्त । असे पुढच्या अध्यायीं ।।३५।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे षष्ठे खंडे विकटचरिते भ्रूशुंडीदेवेंद्रसंवादसमाप्तिवर्णनं नामैकोनत्रिंशत्तमोऽध्यायः समाप्तः । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय एकोणतिसांवा संपूर्ण)